नौरोसजी वाडिया मॅटर्निटी हॉस्पिटल, परळ, मुंबई यांना सन २०२१-२२ च्या खर्चावर आधारीत सन २०२२-२३ साठी पहिला हप्ता म्हणुन रुपये ७,५०,००,०००/- इतके सहायक अनुदान वितरीत करण्याबाबत ...

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः अनुदान-२०२४/ प्र.क्र.८/राकावि-२,

गो.ते.रूग्णालय आवार, संकूल इमारत, १० वा मजला,
बी-विंग, मंत्रालय, मुंबई - ४००००१
दिनांक : १५ मार्च, २०२४.

वाचा :-

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: अनुदान२००९/प्र.क्र.४२/आरोग्य-५, दिनांक १३.०१.२०१०
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०५.०२.२०२४
३) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : अनुदान-२०२४/प्र.क्र.८/राकावि-२, दिनांक ०८.०२.२०२४
४) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थसंकल्प व प्रशासन), मुंबई यांचे पत्र जा.क्र. ससंआसे/ सहा.अनु/कक्ष ६४/शा नि अनुदानाबाबत/१६९५-९६/२४, दिनांक १८.०१.२०२४

प्रस्तावना :-

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या शासन निर्णय दि.१३.०१.२०१० अन्वये नौरोसजी वाडीया मॅटर्निटी रुग्णालय, परळ, मुंबई येथील रुग्णालयास शासनाकडून अनुदान मंजूर करण्याबाबत सुधारित धोरण निश्चित करण्यात आलेले आहे. त्यानुसार नौरोसजी वाडीया मॅटर्निटी रुग्णालयाच्या एकूण खर्चातील केवळ वेतन भत्ते व औषधावरील खर्चासाठी संस्थेला अनुदान अनुज्ञेय असून हे अनुदान एकूण खर्चाच्या ८५% मर्यादेत (पैकी ५०% राज्यशासनाचा हिस्सा व उर्वरित ५०% बृहन्मुंबई महानगरपालिकेचा हिस्सा) मंजूर केले जाते. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थसंकल्प व प्रशासन), मुंबई यांनी संदर्भीय दिनांक १८ जानेवारी, २०२४ च्या पत्रान्वये नौरोसजी वाडीया मॅटर्निटी हॉस्पिटल, परळ, मुंबई या संस्थेस सन २०२१-२२ च्या खर्चावर आधारीत सन २०२२-२३ साठी रु.१९,७५,२६,२०६/- इतक्या सहायक अनुदानाचा प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. सन २०२१-२२ च्या खर्चावर सन

२०२२-२३ साठी संस्थेस देय असलेल्या रक्कमेपैकी वित्त विभागाच्या संदर्भीय क्र.२ नुसार वितरीत केलेल्या अनुदानापैकी पहिला हप्ता म्हणुन रु.७,५०,००,०००/- इतके सहायक अनुदान सदर रुग्णालयास मंजुर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

नौरोसजी वाडीया मॅटर्निटी रुग्णालय, परळ, मुंबई या संस्थेस सन २०२१-२२ च्या खर्चावर आधारीत सन २०२२-२३ साठी पहिला हप्ता म्हणुन **रुपये ७,५०,००,०००/- (अक्षरी रुपये सात कोटी पन्नास लाख फक्त)** इतके सहायक अनुदान, वित्तीय वर्ष सन २००९-१० ते सन २०१९-२० या कालावधीत उपलब्ध करुन देण्यात आलेल्या सहायक अनुदानाच्या लेखापरिक्षणातील निरीक्षणाच्या अधीन मंजुर करुन, अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च "मागणी क्रमांक आर-१, २२१० -वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१-नागरी आरोग्य सेवा- विषम चिकित्सा, ११०-रुग्णालये व दवाखाने, (०३) मुफसल रूग्णालये व दवाखाने यांना सहाय्यक अनुदाने, (०३) (०१)- अध्यापनेत्तर रूग्णालये व दवाखाना यांना सहाय्यक अनुदान, ३१ सहाय्यक अनुदाने, (अनिवार्य) (२२१० ०१७३)" या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ साठी अर्थ संकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. नौरोसजी वाडिया मॅटर्निटी हॉस्पिटल, परळ, मुंबई या संस्थेस अनुदान वितरीत करण्यास उपसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. नौरोसजी वाडीया मॅटर्निटी रुग्णालयास ज्या अटी व शर्ती लागू आहेत. (उदा. गरीब रुग्णांना मोफत किंवा कमी दराने सेवा पुरविणे) त्यांचे पालनासंबंधीची तपासणी संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांनी करणे आवश्यक आहे.

५. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांच्या कार्यालयाकडुन नौरोसजी वाडिया मॅटर्निटी रुग्णालयाच्या सहायक अनुदावरील खर्चाचे हिशोबाची निरिक्षणासाठी मागणी केली जाईल त्यावेळी आवश्यक अभिलेख महालेखापाल कार्यालयास तात्काळ उपलब्ध करुन देणे बंधनकारक राहील.

६. नौरोसजी वाडिया मॅटर्निटी हॉस्पिटल, परळ, मुंबई यांनी शासकीय अनुदान म्हणून मिळणाऱ्या रकमेचे हिशेब त्यांच्या नेहमीच्या इतर कार्यक्रमातून वेगळे ठेवणे आवश्यक आहे.

७. मंजूर नसलेल्या बाबींवरील खर्चाचा समावेश अनुदानात करण्यात आल्याचे आढळून आल्यास अथवा सहायक अनुदानाचा गैरवापर झाल्यास त्या खर्चाची एक रकमी वसुली करण्याचा अधिकार शासनास राहील, त्याकरिता वेळेचे बंधन असणार नाही.

८. हा शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दि.१७ एप्रिल, २०१५ च्या शासन निर्णयानुसार वित्तीय अधिकार नियमामध्ये करण्यात आलेल्या सुधारणाप्रमाणे वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ चा भाग पहिला, उपविभाग-एक अनुक्रमांक २७ मधील नियम क्र.१४९ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेले आहेत.

९. सदर आदेश शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.०५ फेब्रुवारी,२०२४ नुसार तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१२६/व्यय-१३, दि.२३/०२/२०२४ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळा वर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१४१५४६३७१९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHANDRAKANT HARIDAS WADE

Digitally signed by CHANDRAKANT HARIDAS WADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=7a8cb09a73bc92b24a171080ebd81893480c90bedd57685ea1ce3af533f64bce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9474E7143B2BC3FD96E8D7BF07D1CE51DE8461D4C34AE1E3F643C11B54523936, cn=CHANDRAKANT HARIDAS WADE
Date: 2024.03.15 17:28:38 +05'30'

**(चंद्रकांत ह. वडे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
२. संचालक, आरोग्य सेवा (२), आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थसंकल्प व प्रशासन ), मुंबई/पुणे.
४. उप संचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे.
५. सहाय्यक संचालक, ( लेखा व सेवा परिक्षा ), आरोग्य सेवा, पुणे.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा ),महाराष्ट्र-१, मुंबई.
७. जिल्हा कोषाधिकारी, ठाणे/ पुणे.
८. वित्त विभाग (अर्थ-३/व्यय-१३), मंत्रालय, मुंबई-३२.
९. अवर सचिव ( अर्थसंकल्प ), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुबई.
१०.अध्यक्ष, नौरोसजी वाडिया मॅटर्निटी हॉस्पिटल, परळ, मुंबई.
११. निवड नस्ती (राकावि-२).